सन २०२७ मध्ये नाशिक येथे होणाऱ्या सिंहस्थ कुंभमेळ्याच्या तयारीच्या अनुषंगाने समिती गठीत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग (माहिती तंत्रज्ञान)
शासन निर्णय क्र.-संकीर्ण-१७२५/प्र.क्र.७९/मातं
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १८ जून, २०२५

**प्रस्तावना :-**

सन २०२७ मध्ये नाशिक-त्र्यंबकेश्वर या तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी कुंभमेळा होणार आहे. या कुंभमेळ्यात महाराष्ट्र राज्यासह देशा विदेशातील भाविक नाशिक-त्र्यंबकेश्वर येथे दर्शनासाठी मोठया संख्येने येणार आहेत. येणाऱ्या भाविकांच्या सुरक्षिततेसाठी व संपर्कासाठी अत्याधुनिक यंत्रणा उभारणेबाबतचा अभ्यास करण्यासाठी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

सन २०२७ मध्ये नाशिक येथे होणाऱ्या सिंहस्थ कुंभमेळ्याच्या तयारीच्या अनुषंगाने येणाऱ्या भाविकांच्या सुरक्षिततेसाठी व संपर्कासाठी अत्याधुनिक यंत्रणा उभारणेबाबतचा अभ्यास करण्याकरीता संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) | संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई | अध्यक्ष |
| २) | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ, मुंबई. | सदस्य |
| ३) | उपसचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग | सदस्य |
| ४) | श्री. विजय पाटील, माहिती तंत्रज्ञान संचालनालय (DIT) | सदस्य |
| ५) | श्री. आलोक मिश्रा, माहिती तंत्रज्ञान संचालनालय (DIT) | सदस्य |
| ६) | विभागीय आयुक्त, नाशिक यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ७) | कक्ष अधिकारी (तांत्रिक) | सदस्य सचिव |

२. उपरोक्तप्रमाणे गठीत समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील. त्यानुषंगाने या समितीने अभ्यास करुन पॉवर पॉईंट प्रेझेंन्टेशन (PPT) सह अहवाल शासनास सादर करावा यामध्ये शासनास आवश्यकतेप्रमाणे सुधारणा सुचविण्याचे अधिकार राहतील -

१) २०२७ चा कुंभमेळा " डिजिटल टेक्नॉलॉजी कुंभ" म्हणून ओळखला जावा यासाठी नियोजन करावे. याकरीता संपूर्ण कुंभमेळ्यामध्ये कृत्रिम बुध्दिमत्ता यासारख्या अत्याधुनिक तंत्रज्ञानाचा वापर करावा. विशेषत: गर्दीचे आणि वाहतुकीचे नियोजन यामध्ये अत्याधुनिक तंत्रज्ञान वापरावे.

२) कुंभमेळ्यासाठी भाविकांना उत्कृष्ट प्रकारची अनुभूती मिळेल अशा पध्दतीच्या प्रदर्शनी जसे की, digital, audio-visual, interactive, AR/VR अशा प्रकारच्या अत्याधुनिक तंत्रज्ञानाचा उपयोग करुन केलेल्या प्रदर्शनी यांचे नियोजन करावे.

३) सर्व टेलिकॉम कंपन्यांशी संपर्क साधून कुंभमेळा काळात मोबाईल कनेक्टीव्हीटी उत्तम राहील याविषयी आवश्यक ती कार्यवाही करावी.

३. उपरोक्त गठीत समितीची बैठक दर आठवडयाला घेण्यात येईल. या समितीस आवश्यकतेनुसार शासनाच्या इतर विभागाचे अधिकारी व या क्षेत्रातील माहिती तंत्रज्ञानाशी संबंधित तज्ञ व्यक्तींना विचारविनिमयासाठी आमंत्रित करण्याचे अधिकार राहतील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा साकेतांक २०२५०६१८१३०१५२८५०७ असा आहे. हा आदेश डीजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

EKNATH KASHINATH GAGARE

Digitally signed by EKNATH KASHINATH GAGARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=General Administration Dep., 2.5.4.20=D9A3CCBC053D2CF9B4C30C85BB8DB0E6C39331B90D48B0ABA6CDE387B5EC208C, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6BC79F4A08CA2D5D74E02E7214F6AAD4EF7D9AFDEBA5BFCDEF24D45049099939, cn=EKNATH KASHINATH GAGARE
Date: 2025.06.18 13:03:15 +05'30'

**( एकनाथ गागरे )**

**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

२. मा. उप मुख्यमंत्री तथा मंत्री (नगरविकास) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

३. मा. उप मुख्यमंत्री तथा मंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

४. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई.

५. मा. मंत्री, माहिती तंत्रज्ञान व सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

६. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

७. प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

८. प्रधान सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

९. प्रधान सचिव, माहिती तंत्रज्ञान यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

१०. विभागीय आयुक्त, नाशिक.

११. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, नाशिक.
१२. संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई
१३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ, मुंबई.
१४. उपसचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. कक्ष अधिकारी (तांत्रिक), माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई.
१६. श्री.विजय पाटील, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई.
१७. श्री.आलोक मिश्रा, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई.
१८. निवडनस्ती/मातं